सन २०२५-२६ मधील औषध व साधन सामग्री खरेदीकरिता रक्कम रु १८६३५.०६ लक्ष इतका निधी लेखाशिर्ष २२१० K०९७ (३१) अंतर्गत खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२५/प्र.क्र.१२७/खरेदी कक्ष

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०००01.
दिनांक : १८ जून, २०२५.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, उद्योग,ऊर्जा व कामागार विभाग,क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग III/ उद्योग -४, दि. ०१.१२.२०१६
२. अतिरिक्त संचालक,आरोग्य सेवा (कुटुंब कल्याण,माता बाल संगोपन व शालेय आरोग्य),पुणे यांचे पत्र क्र.राकुकका/कक्ष-१५/खरेदी प्रक्रिया/२६८७३-७७, दि.०४.०६.२०२५

**प्रस्तावना:-**

राष्ट्रीय आरोग्य अभियान सन २०२५-२६ मधील आरएमएनसीएचए+एन या कार्यक्रमांतर्गत विविध प्रकारच्या औषध व साधन सामग्री खरेदी राज्य शासनाच्या नियमित लेखाशिर्षा मधून करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियान सन २०२५-२६ च्या पीआयपीला आरएमएनसीएचए+एन या कार्यक्रमांतर्गत विविध प्रकारच्या औषध खरेदीची मागणी असुन या करीता पीआयपी २०२५-२६ नुसार औषधे/साधनसामग्रीची आवश्यकता आहे. तथापी राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत केंद्रशासनाच्या निधीची कमतरता असल्याने औषधे/ साधनसामग्री खरेदी ही राज्यशासनाच्या नियमित निधी (StateBudget) मधून सहसंचालक रुग्णालय व सहसंचालक खरेदी कक्ष यांच्यामार्फत करण्याचे प्रस्तावित आहे.

२. आरएमएनसीएच+ए या कार्यक्रमातंर्गतकेंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना, लाभार्थी, तसेच जिल्हा,मनपा व वैदयकिय शासकिय महाविदयालय निहाय प्राप्त झालेली मागणी विचारात घेऊन खालीलप्रमाणे कुटुंब कल्याण कार्यक्रमांतर्गत औषधी व साधन सामुग्रीच्या खरेदी प्रस्तावित आहे:-

| Sr. No. | Name of Item (Drug / Consumables) | Number of Items Proposed for Procurement | Proposed Quantity Year २०२२-२४ (२ Years) | Approximate Rate | Approximate Budget (In Lakhs) |
|---|---|---|---|---|---|
| १ | Drug (as per SDL) | ६१ | Annexure A Attached | Mentioned in AnnexureA | **१३९२३.८१** |
| २ | Consumables (as Per SCL) | १७ | Annexure B Attached | Mentioned in AnnexureB | **५०७५.५९** |
| Total Amount of Proposal Rupees in Lakhs | | | | | **१८६३५.०६** |

३. उपरोक्त मागणीनुसार खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून वाचा येथील क्र.२ येथील अतिरिक्त संचालक,आरोग्य सेवा (कुटुंब कल्याण,माता बाल संगोपन व शालेय आरोग्य),पुणे यांच्या प्रस्तावास खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. **अटी व शर्ती :-**

१. सदर खरेदी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण,मुंबई यांनी शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित पध्दतीने खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

२. खरेदी करावयाची औषधे व साहित्य सामुग्री तसेच इतर बाबी करीता सक्षम प्राधिकरणाने तांत्रिक मान्यता दिल्यानंतरच खरेदीची प्रक्रीया राबविण्यात यावी.

३. सदर सेवेसाठी शासन निर्णय, उद्योग,ऊर्जा व कामागार विभाग,क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग III/ उद्याग-४, दि. ०१.१२.२०१६ अन्वये प्रसिध्द केलेल्या सुधारीत नियमपुस्तिकेत विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

४. निविदा प्रक्रिया राबवितांना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

५. प्रशासकीय मान्यता देताना प्रक्रियेअंतीम निश्चित करण्यात आलेला दर हा बाजारभावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधीत पुरवठादाराने या बाबींचा इतर ठीकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५. या बाबीसाठी होणारा खर्च हा
मागणी क्र. आर-१
२२१०, वैद्यकीय सेवा वा सार्वजनिक आरोग्य,
११०, रुग्णालये व दवाखाने
२०० इतर आरोग्य योजना
(० ३) महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण
(०३) (० १) महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरणामार्फत औषधे,आषधी साहित्य,यंत्रसामग्री व साधनसामग्री खरेदी (२२१० के ०९७)

सर्वसाधारण (३१) सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१८११२१४१९११७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by
Ashok Saundaji Kayande
Date: 18-06-2025
12:33:55

**( अशोक कायंदे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई/पुणे
३) सहसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालय) राज्यस्तर मुंबई
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वैदयकीय वस्तु खरेदी प्राधिकरण, मुंबई
५) अतिरिक्त संचालक,आरोग्य सेवा (कुटुंब कल्याण,माता बाल संगोपन व शालेय आरोग्य),पुणे.
६) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
७) सह संचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),मुंबई
९) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),नागपूर
१०) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई
११) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
१२) उपसंचालक,आरोग्य सेवा,पुणे मंडळ,पुणे.
१३) निवडनस्ती (खरेदी कक्ष)